**महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळास सन २०१४-१५ या वर्षाकरिता सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत-**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय, क्र.लविम-१३१४/प्र.क्र.६९/उद्योग-६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३० मार्च, २०१५.

**वाचा :-** १) शासन परिपत्रक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.बीयुडी २०१४/२०१४-२०१५/(७७०)/ प्रशासन-१, दिनांक ०९ एप्रिल, २०१४.
२) वित्त विभाग , परिपत्रक क्र.अर्थसं-२०१४/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प-३, दिनांक २९ मार्च, २०१४.
३) वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं-२०.१४/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प-३, दिनांक १७ एप्रिल, २०१४.
४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामागार विभाग क्र.लविम-१३१४/प्र.क्र.६९/ उद्योग-६, दिनांक ३० जून, २०१४.
५) वित्त विभाग, परिपत्रक क्र. अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दिनांक ०१ जुलै, २०१४.
६) शासन परिपत्रक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.बीयुडी-२०१४/२०१४-१५/(७७०)/प्रशासन-१, दिनांक ०७ जुलै, २०१४.
७) वित्त विभाग, परिपत्रक क्र. अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दिनांक ०२ जानेवारी, २०१५.

**शासन निर्णय :-**

" महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१४ (महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम, २०१४ च्या अनुसूचीच्या स्तंभ क्र. ७ व ८ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रक्कमासह)" यास महाराष्ट्र विधानमंडळाने मंजुरी दिलेली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे, आणि ते २०१४ चा अधिनियम क्रमांक ४ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक ०३ मार्च, २०१४ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे. या अधिनियमान्वये सन २०१४-१५ या वर्षाकरिता करावयाच्या खर्चास अनुमती देण्यात आलेली आहे. त्यानुसार उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने अर्थसंकल्पिय तरतूद दिनांक ०९ एप्रिल, २०१४ च्या परिपत्रकान्वये संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना सुपूर्द करण्यात आली आहे.

२. सन २०१४-१५ या वित्तीय वर्षाकरिता ३१,सहायक अनुदान(वेतनेत्तर) या उद्दिष्टाखाली रुपये ७५,००,०००/- (रुपये पंच्याहत्तर लाख फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. त्यापैकी दिनांक ०१/०४/२०१४ ते ३१/०७/२०१४ या कालावधीतील खर्च भागविण्यासाठी रुपये २५,००,०००/- (रुपये पंचवीस लाख फक्त) इतके सहायक अनुदान शासन निर्णय दिनांक ३० जून, २०१४ अन्वये वितरीत करण्यात आलेले आहे.

३. वित्त विभागाच्या परिपत्रक दिनांक ०२ जानेवारी, २०१५ मधील तरतुदीनुसार आता ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या उद्दिष्ठाखाली उर्वरित रक्कम रू.३५,००,०००/- (अक्षरी रूपये पस्तीस लाख फक्त)

इतके सहाय्यक अनुदान ८० टक्केच्या मर्यादेत व अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर दर्शविल्याप्रमाणे वितरीत करण्यात येत आहे.

४. यावरील खर्च मागणी क्रमांक के -७, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, (००) १०४ हस्तव्यवसाय उद्योग (००) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजना (००) (०२) हस्तव्यवसाय उद्योगाचा विकास (२८५१ ०५६ ७) ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)" या उद्दिष्टांखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर रकमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात येत असून उक्त प्रयोजनाकरिता करण्यात आलेल्या खर्चाचे विनियोग प्रमाणपत्र महामंडळाने विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना सादर करावे. लेख्यांच्या (खर्चमेळाबाबत महालेखापाल (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई व महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर यांच्या कार्यालयास विहित कालावधीत, विहित पध्दतीनुसार आवश्यक ती कागदपत्रे महामंडळाने सादर करावीत.

६. तसेच योजनेमधील अटी व शर्ती, निकष प्रचलित शासन निर्णय इ. ची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळाची राहील याच्या अधिन राहून सदर रक्कम वितरीत करण्यात येत आहे.

७. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांनी उपरोक्त प्रयोजनावर खर्च झालेल्या मासिक निधीची आकडेवारी कार्यासन अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांना दर महिन्याच्या १० तारखेपूर्वी सादर करावीत.

८. सदर शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दिनांक ०२ जानेवारी, २०१५ च्या अनुषंगाने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक१६७/ १५/व्यय-१६, दिनांक २५ मार्च, २०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१५०३३०११३७२८७३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Latke Vaijanath B

Digitally signed by Latke Vaijanath B
DN: CN = Latke Vaijanath B, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Industry Energy and Labour
Date: 2015.03.30 14:04:51 +05'30'

**(वै. भू. लटके)**
उप सचिव

**प्रति** :- माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित :-

१. सचिव (लघु व मध्यम उद्योग), तथा पदसिध्द विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई

२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ, मुंबई.

३. वित्त नियंत्रक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ, मुंबई.
४. लेखा अधिकारी, विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. संचालक, लेखा व कोषागारे, फ्री प्रेस जनरल मार्ग, मुबंई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का-१४६१), मंत्रालय, मुंबई.
११. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (अर्थसं-१४ व व्यय-१६), मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी (प्रशासन-१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती /उद्योग-६